**राष्ट्रीय इंडियन मिलिटरी कॉलेज डेहराडून येथे महाराष्ट्र राज्यातून प्रवेश घेणा-या विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीच्या दरात वाढ करण्याबाबत---**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- संकीर्ण-२०१५ /प्र.क्र.१८ (भाग-२)/एसडी-५**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२
दिनांक :- २५ जुलै, २०१७

**वाचा :-**

१) शासन निर्णय शिक्षण विभाग क्र.एमईडी-१२५६/सी- दिनांक २४/०२/१९५८.
२) शासन निर्णय शालेय शिक्षण विभाग क्र.एचसीएच-२०१४/(४४/१४)/एसएम-६, दिनांक १२/३/२०१४.
३) शिक्षण संचालक यांचे पत्र क्र.शिष्यवृत्ती-२२४/आरआयएमसी/२०१५-१६/१५३०, दिनांक ४/०३/२०१६.

**प्रस्तावनाः-**

राष्ट्रीय इंडियन मिलिटरी कॉलेज डेहराडून येथे महाराष्ट्र राज्यातून इ.८ वी ते १२ वी पर्यंत शिक्षण घेण्यासाठी प्रवेश घेणा-या चार विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती देण्याची योजना शासन निर्णय दि.२४/२/१९५८ अन्वये मंजूर करण्यात आली आहे. शासन निर्णय दि.१२ मार्च, २०१४ अन्वये या विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीची रक्कम सद्य:स्थितीत रु.२०,०००/- असून आता राष्ट्रीय इंडियन मिलिटरी कॉलेज डेहराडून यांच्या शैक्षणिक शुल्कात झालेली वाढ, शैक्षणिक वर्षाचा वार्षिक खर्च तसेच इतर राज्यांचे शिष्यवृत्तीचे दर लक्षात घेऊन महाराष्ट्र राज्यातील विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीच्या रकमेत वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय इंडियन मिलिटरी कॉलेज डेहराडून या संस्थेत महाराष्ट्र राज्यातून इ.८ वी ते १२ वी पर्यंत शिक्षण घेण्यासाठी प्रवेश घेणा-या विद्यार्थ्यांना संदर्भ २ च्या शासन निर्णयान्वये रु.२०,०००/- वार्षिक शिष्यवृत्ती मंजूर करण्यात आली होती. सदर शिष्यवृत्तीमध्ये रु.४०,०००/- वार्षिक इतकी वाढ करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर वाढीव शिष्यवृत्तीचा लाभ जानेवारी, २०१७ च्या सत्रापासून नव्याने प्रवेश घेतलेल्या तसेच संस्थेत शिक्षण पुढे चालू ठेवलेल्या विद्यार्थ्यांना अनुज्ञेय राहील. वरीलप्रमाणे शिष्यवृत्तीच्या दरात वाढ केल्यामुळे वाढीव खर्च " मागणी क्र. ई.-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण ,८०, सर्वसाधारण १०७, शिष्यवृत्त्या (००) (००) (०१) सैनिकी शाळा व महाविद्यालये (२२०२ ११९८) " या लेखाशिर्षाखाली सन २०१७-२०१८ या वर्षाच्या मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौ. सं.क्र. ५८५ व दि. ३० जून, २०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा सांकेतांक २०१७०७२५१५४३५९३१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Neha Nandkumar Humraskar

Digitally signed by Neha Nandkumar Humraskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fad9131f2c2ae9d6d9bb053715c4b9e08b15382beb01922a7bf2c233de3f7a45, cn=Neha Nandkumar Humraskar
Date: 2017.07.25 15:51:22 +05'30'

**(नेहा हुमरसकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक
२. मा.प्रधान सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक
३. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक ), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. आयुक्त, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
६. सर्व शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद.
७. शिक्षण निरीक्षक (उत्तर/दक्षिण/पश्चिम), बृहन्मुंबई.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०.महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. वित्त विभाग (व्यय ५), मंत्रालय, मुंबई
१५. मेजर जनरल, जनरल ऑफिसर कमांडिंग, महाराष्ट्र एवं गुजराथ एरिया, कुलाबा,मुंबई-४०० ००५.
१६. कमांडंट राष्ट्रीय मिलिटरी कॉलेज, डेहराडून कॅन्टॉनमेंट (उत्तराखंड)
१७.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
१८. निवड धारिका एसडी.-५